आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२४-२५ या आर्थिक वर्षामध्ये भारताचे संविधान याच्या अनुच्छेद २७५(१) अन्वये केंद्रीय सहाय्य-आश्रमशाळा समूह (कार्यक्रम) या योजनेसाठी निधी वितरण.
लेखाशिर्ष (२२२५ २५८७)

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२४/प्र.क्र.२/ कार्यासन ६**
**मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२.**
**दिनांक : ३० मार्च, २०२५.**

**वाचा :-**

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दि.०१.०४.२०२४.
२) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.२५.०७.२०२४, दि. १२.०२.२०२५ व दि. १७.०३.२०२५.
३) कार्यासन-१३, आदिवासी विकास विभाग नस्ती क्रमांक एकलव्य-२०२५/प्र.क्र.४५/का.१३

**प्रस्तावना :-**

आदिवासी घटक कार्यक्रम अंतर्गत एकलव्य मॉडेल निवासी शाळांकरिता भारताचे संविधान याच्या अनुच्छेद २७५(१) अन्वये केंद्रीय सहाय्य-आश्रमशाळा समूह (कार्यक्रम) या योजनेंतर्गत सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाच्या तरतूदीतून निधी वितरीत करण्यास्तव संदर्भ क्र. (३) येथील नस्तीद्वारा वित्त विभागास प्रस्ताव सादर करण्यात आला होता. सदर प्रस्तावास वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेनुसार निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विधाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

आदिवासी घटक कार्यक्रम अंतर्गत मागणी क्र.टी-५ मधील २२२५-अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण या मुख्य लेखाशीर्षाखालील भारताचे संविधान याच्या अनुच्छेद २७५(१) अन्वये केंद्रीय सहाय्य-आश्रमशाळा समूह (कार्यक्रम) या योजनेसाठी सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पीत तरतुदीतून सुधारित अंदाजाच्या मर्यादेत वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेनुसार पुढीलप्रमाणे निधी वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे :-

**(रु. लाखात)**

| **योजना** | **लेखाशिर्ष** | **बाब** | **सन २०२४-२५ साठी मंजूर सुधारित अंदाज** | **या शासन निर्णयान्वये वितरीत निधी** |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| **भारताचे संविधान याच्या अनुच्छेद २७५(१) अन्वये केंद्रीय सहाय्य-आश्रमशाळा समूह (कार्यक्रम)** | २२२५ २५८७ | ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) | ७००.०० | ४९०.०० |

२. उपरोक्त प्रमाणे **एकूण रु. ४९०.०० लाख (अक्षरी रुपये चार कोटी नव्वद लाख फक्त) इतका निधी नियंत्रक अधिकारी म्हणून आयुक्त, आदिवासी विकास आयुक्तालय, नाशिक** यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर (BEAMS) वितरीत व खर्च करण्यास याद्वारे शासनाची मान्यता देण्यात येत आहे. ज्या प्रयोजनासाठी निधी मागणी करण्यात आली आहे, त्याच प्रयोजनासाठीच निधी खर्च करण्याची तसेच, सदर प्रकरणी विहीत कार्यपध्दतीचा अवलंब केल्याची खातरजमा करुनच सदरचा खर्च करण्याची जबाबदारी नियंत्रक अधिकारी यांची राहील.

३. सदर तरतुद खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भ क्र. (१) व (२) येथील शासन आदेशातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करण्याची जबाबदारी संबंधित नियंत्रक अधिकारी यांची राहील.

४. सदर लेखाशिर्षाखाली वितरीत केलेला निधी दि. ३१.०३.२०२५ पर्यंत खर्ची पडेल, याची नियंत्रक अधिकारी यांनी दक्षता घ्यावी. त्या अनुषंगाने झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/उप लेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्टाबाबतची माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र इ. माहिती आदिवासी विकास विभागास १० तारखेपर्यंत पाठविण्यात यावी.

५ सदर शासन निर्णय वित्त विभागाने अनौपचारिक संदर्भ क्र. ३९६/८०२५, दि. २७.०३.२०२५ वर दिलेली मान्यता व वित्त विभागाचे संदर्भ क्र.१ व २ येथील शासन परिपरिपत्रकांमधील तरतूदी/ निर्देशांस अनुलक्षून तसेच, प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहेत.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०३३०१३०९५८९७२४ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

KIRAN KISANRAO PAWAR

Digitally signed by KIRAN KISANRAO PAWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=68d8b19f123ba59448c0926a91296205b9a87463f831a2beea0be5cb381a34e8, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=344DE3FF07B9439DD11CAF728255A5EB0A0DD495EF82F989931088637D8211C0, cn=KIRAN KISANRAO PAWAR
Date: 2025.03.30 14:48:14 +05'30'

(किरण कि. पवार)
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. राज्यमंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. सचिव, आदिवासी विकास विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
४. आयुक्त, आदिवासी विकास आयुक्तालय, नाशिक.
५. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक / नागपूर / ठाणे / अमरावती.
६. जिल्हाधिकारी (सर्व)
७. जिल्हा कोषा अधिकारी (सर्व)
८. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
९. वित्त विभाग ( अर्थसंकल्प- व्यय-१४ व अर्थसंकल्प-१९ ), मंत्रालय, मुंबई.
१०. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा मजला, विधानभवन, मुंबई.
११. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
१२. कार्यासन क्र.१३, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.